**चेंबूर, मुंबई येथील सर्व्हे क्र.४६९-अ या शासकीय भूखंडाचा (भिक्षेकरी गृह चेंबूर) खाजगीकरणाच्या माध्यमातून विकास करणे - मुदतवाढ देणेबाबत व मंजूर करारनाम्याप्रमाणे** Substitution Agreement **करण्याबाबत परवानगी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-२००१/प्र.क्र.१३२ (भाग-३)/रस्ते-८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३ ऑक्टोबर, २०१८.

**प्रस्तावना** :-

चेंबूर, मुंबई येथील सर्व्हे क्र.४६९-अ या शासकीय भूखंडाचा (भिक्षेकरी गृह चेंबूर) खाजगीकरणाच्या माध्यमातून विकास करणे या प्रकल्पास मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या दि.८ ऑगस्ट, २००७ रोजी बैठकीमध्ये प्रशासकीय मान्यता देण्यात आली. या कामाचे कार्यारंभ आदेश दिनांक २७.०६.२००८ रोजी देण्यात आले. मूळ प्रकल्पाची मुदत दिनांक २६.१२.२०११ पर्यंत होती. पहिली मुदतवाढ दिनांक २६.१२.२०१४ पर्यंत व दुसरी मुदतवाढ दिनांक २६.१२.२०१७ पर्यंत देण्यात आली होती.

या प्रकल्पातील जमिनीच्या दक्षिण जागेवरील अतिक्रमणे, भिक्षेकरी गृहाच्या जागेवरील अतिक्रमणे, विकास आराखडयातील सुधारणा, सेवानिवृत्त शासकीय कर्मचाऱ्यांची अतिक्रमणे, न्यायालयीन प्रकरणे, झाडे तोडण्याबाबतची परवानगी इत्यादी कारणास्तव विकासकास संपूर्ण भूखंड कामकाजासाठी उपलब्ध होवू शकला नाही. सद्य:स्थितीत या प्रकल्पातील अवरोधांचे निराकरण झालेले असल्याने प्रकल्पास दिनांक २७.१२.२०१७ पासून ४२ महिने म्हणजेच दिनांक २६.०८.२०२१ पर्यंत तिसरी मुदतवाढ देणे व मंजूर करारनाम्याप्रमाणे Substitution Agreement करण्याबाबत परवानगी देणे, याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने दि.२३ ऑगस्ट, २०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या बैठकीत सदर प्रस्तावास मंजुरी प्रदान केली असून, त्यानुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय** :-

चेंबूर, मुंबई येथील सर्व्हे क्र.४६९-अ या शासकीय भूखंडाचा (भिक्षेकरी गृह चेंबूर) खाजगीकरणाच्या माध्यमातून विकास करणे या प्रकल्पास दिनांक २७.१२.२०१७ पासून ४२ महिने म्हणजेच दिनांक २६.०८.२०२१ पर्यंत तिसऱ्या मुदतवाढीस मान्यता प्रदान करण्यात येत आहे व मंजूर करारनाम्याप्रमाणे Substitution Agreement करण्याबाबत परवानगी देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या दिनांक २३.०८.२०१८ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार व नियोजन विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८३/का.१४३३, दि.२१.०८.२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००३१६०९४९८११८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Avinash Trimbakrao Dhondge

Digitally signed by Avinash Trimbakrao Dhondge
DN: CN = Avinash Trimbakrao Dhondge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Works Department
Date: 2018.10.03 16:14:59 +05'30'

**(अविनाश त्रिं. धोंडगे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत -**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३) मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, मुंबई
१४) सर्व मंत्रालयीन विभाग
१५) निवड नस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई